**शासकीय हवाई वाहनांच्या उड्डाणापूर्वी करण्यात येणा-या वैमानिकांच्या वैदयकीय चाचणीची सुविधा विमानचालन व्यवस्थापन कंपनीकडे हस्तांतरित करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विचासं १११४/प्र.क्र.१०२/२८अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: **१८ ऑक्टोबर, २०१४**

वाचा

1) **शासन निर्णय क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. विचासं १११४/प्र.क्र.४७/२८-अ

**प्रस्तावना**

शासकीय हवाई वाहनांच्या उड्डाणापूर्वी वैमानिकांची प्रशिक्षित व परवानाधारक डॉक्टरांमार्फत वैदयकीय तपासणी करण्यात येते. या तपासणीकरीता लागणारे डॉक्टर हवाई वाहनांची देखभाल करणा-या कंपनीकडून उपलब्ध करून देण्यात येत होते.

परंतु केंद्र शासनाच्या नागरी विमानन प्राधिकरणाच्या नियमांनुसार ही सुविधा (वैदयकीय तपासणीकरीता डॉक्टर उपलब्ध करुन देणे) विमानचालन व्यवस्थापन कंपनीने (ग्राउंड हँडलिंग एजन्सी) करणे आवश्यक आहे. त्यामुळे सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

शासकीय वाहनांच्या हवाई उड्डाणापूर्वी करण्यात येणा-या वैमानिकांच्या वैदयकीय तपासणीसाठीचे डॉक्टर विमानचालन व्यवस्थापन कंपनीमार्फत उपलब्ध करुन घेण्यात यावेत. सदरचा निर्णय मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२२.४.२०१४ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार घेण्यात येत आहे. .

२. याप्रित्यर्थचा खर्च खालील लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. ए - ४ २०७०, इतर प्रशासनिक सेवा
००,११४ परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण
(००)(०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (२०७० ०१५६)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२०१२५२५१९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2014.10.20 13:08:59 +05'30'

**(समीर सावंत)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अप्पर मुख्य सचिव (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अप्पर मुख्य सचिव (नियोजन),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई.
८. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू, मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औदयोगिक विकास महामंडळ, मुंबई.
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२.निवडनस्ती.